S - 200407191403520001 - 2500

**अंगणवाडी कार्यकर्तींना राज्यस्तरीय पुरस्कार (२००२-२००३) छाननी समितीची स्थापना करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक - एबावि २००४/ प्र क्र ११७/ का ६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
बी विंग, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : - २६.५.२००४.

**वाचा -** १. केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, महिला व बाल विकास विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ६-३/२००३-एमई, दिनांक २०.२.२००४.
२. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि २०००/प्र क्र १९७/ का ६, दिनांक ११.१०.२०००.

**शासन शुध्दीपत्रक -** एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत उत्कृष्ठ कार्य करणा-या अंगणवाडी कार्यकर्तीच्या कार्याचा गौरव करण्यासाठी केंद्र शासनाने राष्ट्रीय पुरस्कार व राज्यस्तरीय पुरस्कार देण्याची योजना सुरु केली आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेतील परिच्छेद ४.६ च्या अनुषंगाने सन २००२-२००३ साठी केंद्र शासनाच्या पुरस्कारासाठी आयुक्तांकडून प्राप्त झालेल्या नावाची छाननी करुन केंद्र शासनाकडे अंगणवाडी कार्यकर्तीची शिफारस करण्यासाठी उपरोक्त दिनांक ११.१०.२००० च्या शासन निर्णयान्वये प्रधान सचिव / सचिव, महिला व बाल विकास यांचे अध्यक्षतेखाली छाननी समिती गठीत करण्यात आली आहे. या समितीमध्ये प्रधान सचिव / सचिव, (कुटुंब कल्याण) सार्वजनिक आरोग्य विभाग यांची सदस्य म्हणून नियुक्ती करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर छाननी समिती आता खालीप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव/सचिव, महिला व बाल विकास विभाग | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव/सचिव, (कुटुंब कल्याण)सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ३. | प्राचार्या, निर्मला निकेतन, कॉलेज ऑफ होम सायन्स, मुंबई | सदस्य |
| ४. | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई | सदस्य सचिव |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

[जी.एम.फोपळणकर]
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, रायगड भवन,नवी मुंबई
प्राचार्या, निर्मला निकेतन, कॉलेज ऑफ सोशल सायन्स, मुंबई. (पत्राने )
स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव/सचिव, (कुटुंब कल्याण)सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
निवड नस्ती, कार्यासन-६